**आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेसाठी निधी वितरण**
**(लेखाशीर्ष-२२१० जी २८९)**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-**२०२४**/ प्र.क्र.०५/ कार्यासन-६
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख : २१ जून, २०२४.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४.
२) सार्वजनिक आरोग्य विभागाची नस्ती क्र. मफुयो-२०२४/प्र.क्र. ८०/आरोग्य-६.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सार्वजनिक आरोग्य विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या महात्मा प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेअंतर्गत अनुसूचित जमाती प्रवर्गातील लाभार्थ्यांचा माहे एप्रिल ते माहे जून, २०२४ या महिन्यातील विमा हप्ता प्रदानासाठी रु.५६४.५६९७७ लाख इतका निधी सन २०२४-२५ च्या अर्थसंकल्पित तरतुदींतून वितरणासाठी उपलब्ध करुन देण्याबाबत संदर्भाधीन क्र.२ अन्वये वित्त विभागास प्रस्ताव सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावास वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात मागणी क्र.टी-५ मधील मुख्य लेखाशीर्ष २२१०, वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य या मुख्य लेखाशीर्षाखाली महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेंतर्गत माहे एप्रिल, २०२४ ते माहे जून, २०२४ या महिन्यातील विमा हप्ता प्रदानासाठी सन २०२४-२५ च्या अर्थसंकल्पित तरतुदींतून रु.५६४.५६९७७ लाख इतका निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत व खर्च करण्यास खालीलप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे :-

**(रु.लाखात)**

| **योजनेचे नाव** | **लेखाशीर्ष** | **बाब** | **सन २०२४-२५ मधील अर्थसंकल्पीय तरतूद** | **सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी** |
|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** |
| महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजना | २२१०जी २८९ | ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) | १७५००.०० | ५६४.५६९७७ |

२. उपरोक्तप्रमाणे **रु.५६४.५६९७७ लाख (अक्षरी रुपये पाच कोटी चौसष्ट लाख छप्पन्न हजार नऊशे सत्याहत्तर फक्त) इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग** यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०१.०४.२०२४ च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची राहील.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. त्या अनुषंगाने झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतुन फक्त अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांना लाभ मिळेल याची दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित विभागाची राहील.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ इॅ-ऑफिस टिप्पणी क्र.२८, दि.१३.०६.२०२४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०६२११५४७०७९३२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

RAJENDRA
DEVARAM
BHAWARI

Digitally signed by RAJENDRA DEVARAM BHAWARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA,
ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=e2f5429d49742f96b79e4293421ba2dfa8a71cad3864b9b289879d173b67fcdc,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=F617DED8E7182679ED107E63511160B2054D23D8173AD985E5B569A5802CEA5A,
cn=RAJENDRA DEVARAM BHAWARI
Date: 2024.06.21 17:33:28 +05'30'

**( राजेंद्र दे. भवारी )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. सचिव, आदिवासी विकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
५. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
६. वित्त विभाग ( अर्थसंकल्प-१९/ व्यय १४ ), मंत्रालय, मुंबई.
७. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
८. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
९. कार्यासन क्र. ८, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१०. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग.